शासकीय कर्मचाऱ्यांचे सेवानिवृत्तीचे वय ५८ वर्षावरुन ६० वर्षे करण्याच्या अनुषंगाने समिती गठीत करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**वित्त विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : सेनिवे २०१५/प्र. क्र.३६/सेवा ४**

हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा मार्ग,
वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
तारीख: १५/०६/२०१७

**वाचा -**

१) वित्त विभाग शासन निर्णय क्रमांक :सेनिवे २०१५/प्र. क्र.३६/सेवा ४, दिनांक २४.११.२०१६

**प्रस्तावना-**

उपरोक्त संदर्भांकित शासन निर्णयान्वये राज्य शासकीय कर्मचाऱ्यांचे सेवानिवृत्तीचे वय ५८ वर्षावरुन ६० वर्षे करणे योग्य ठरेल किंवा कसे याबाबत अभ्यास करुन सर्वंकष अहवाल शासनास सादर करण्याकरीता श्री.बी.सी.खटुआ (सेवानिवृत्त भा.प्र.से. अधिकारी) यांच्या अध्यक्षतेखाली समिती स्थापन करण्यात आली आहे. सदर समितीने आपला अहवाल समिती स्थापन केल्याच्या दिनांकापासून सहा महिन्यात शासनास सादर करावयाचा होता. त्यानुसार सदर समितीची अहवाल सादर करण्याची मुदत दिनांक २४.०५.२०१७ रोजी संपत आहे. तथापि अहवाल सादर करण्यासाठी आवश्यक माहितीचे संकलन,विश्लेषण तसेच विविध संघटनांची या विषयासंदर्भातील मते जाणून घेण्यासाठी समितीच्या सदस्याच्या आणखी काही बैठका आयोजीत करणे आवश्यक असल्याने समितीला अहवाल सादर करण्यासाठी आणखी काही अवधी देण्याची आवश्यकता आहे.त्याअनुषंगाने समितीच्या कार्यकालास मुदतवाढ देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय-**

वरील वस्तूस्थिती विचारात घेता राज्य शासकीय कर्मचाऱ्यांचे सेवानिवृत्तीचे वय ५८ वर्षावरुन ६० वर्षे करण्याच्या अनुषंगाने गठित करण्यात आलेल्या समितीस आपला अहवाल सादर करण्यासाठी तीन महिने म्हणजेच २४.०८.२०१७ पर्यंत मुदतवाढ देण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०६१५१५३३१६३८०५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Anudeep Shrinivas Dighe

Digitally signed by Anudeep Shrinivas Dighe
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Finance Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=75f50c6671abf79e06e7d05c1f27cdae17ad6b947f5b0d740fa705320bede741, cn=Anudeep Shrinivas Dighe
Date: 2017.06.15 15:31:58 +05'30'

(अनुदीप दिघे)
शासनाचे उप सचिव

**प्रति,**

१) श्री. बी.सी. खटुआ, ८२, प्रणित, जयंत पालकर रोड,पोदार हॉस्पीटल समोर, वरळी, मुंबई-४०००३०.

२) अपर मुख्य सचिव (व्यय),वित्त विभाग, मंत्रालय,मुंबई -४०००३२.
३) अपर मुख्य सचिव, (सेवा),सामान्य प्रशासन विभाग,मंत्रालय, मुंबई-४०००३२.
४) प्रधान सचिव(वि.सु.),वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई -४०००३२
५) संचालक, लेखा व कोषागारे, फ्री प्रेस जर्नल मार्ग, मुंबई-३२.
६) सर्व विधानमंडळ सदस्य,विधानभवन,मुंबई
७) राज्यपालांचे सचिव,
८) मुख्यमंत्र्यांचे सचिव,
९) सर्व मंत्री व राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
१०) मंत्रयालयातील सर्व विभाग,
११) निवड नस्ती,कार्यासन सेवा-४

**प्रत,**

१) अपर मुख्य सचिव (वित्त) यांचे स्विय सहायक, मंत्रालय, मुंबई-३२.

२) अपर मुख्य सचिव (व्यय) यांचे स्विय सहायक, मंत्रालय, मुंबई-३२.

३) प्रधान सचिव (वि.सु.) यांचे स्विय सहायक, मंत्रालय, मुंबई-३२.

४) उपसचिव (सेवा-४) यांचे स्विय सहायक, मंत्रालय, मुंबई-३२.